आमदार स्थानिक विकास कार्यक्रम
सन २०२४-२५ या आर्थिक वर्षासाठी लेखाशीर्ष ४५१५ ००१२ अंतर्गत विधानपरिषद सदस्यामधील विधानसभेवर निवडून आलेल्या ४ सदस्यांना विधानपरिषद सदस्य म्हणून अनुज्ञेय निधी उपलब्ध करून देणेबाबत..

**महाराष्ट्र शासन**
**नियोजन विभाग**
**शासन निर्णय क्रमांक- स्थाविका-०६२४/प्र.क्र. १०० /का-१४८२,**
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
दिनांक - ४ मार्च, २०२५

वाचा:- १) नियोजन विभाग, शासन निर्णय क्र. स्थाविका-०६१६/प्र.क्र.९६/का.१४८२, दि. १२/०७/२०१६.
२) वित्त विभाग, शासन परिपत्रक क्र. अर्थसं-२०२४/प्र.क्र.८०/अर्थ-३, दि. २५/०७ /२०२४.
३) नियोजन विभाग, शासन निर्णय क्र. स्थाविका-०६२४/ प्र.क्र.१००/ का.१४८२, दि.०९/०७/२०२४
४) नियोजन विभाग, शासन निर्णय क्र. स्थाविका-०६२४/प्र.क्र.१००/का.१४८२, दि.०६/०९/२०२४
५) नियोजन विभाग, शासन निर्णय क्र. स्थाविका-०६२४/प्र.क्र.१००/का.१४८२, दि.२८/०९/२०२४
६) नियोजन विभाग, शासन निर्णय क्र. स्थाविका-०६२४/प्र.क्र.१००/का.१४८२, दि.१५/१०/२०२४

**शासन निर्णय :-**

"महाराष्ट्र विनियोजन विधेयक, २०२४" मंजूर झाले असून ते महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या अधिसंमतीनुसार महाराष्ट्र अधिनियम क्र. २७ म्हणून, महाराष्ट्र शासन राजपत्र असाधारण भाग-४, दिनांक १८ जुलै, २०२४ यामध्ये प्रसिध्द करण्यात आले आहे. आमदार स्थानिक विकास कार्यक्रमांतर्गत सन २०२४-२५ या आर्थिक वर्षाकरिता रु.२२००.०० कोटी एवढी तरतूद करण्यात आली आहे. सदर तरतूदीपैकी संदर्भाधीन क्र.२ येथील परिपत्रकान्वये वित्त विभागाने या कार्यक्रमांतर्गत निधी वितरित करण्याचे अधिकार प्रशासकीय विभागास प्रदान केलेले आहेत.

२. १५ व्या विधानसभा सार्वत्रिक निवडणूकीतून विधानपरिषद सदस्यांमधील मा. श्री. आमश्या पाडवी, श्री. गोपिचंद पडळकर,श्री. प्रविण दटके व श्री.चंद्रशेखर बावनकुळे हे ४ विधानपरिषद सदस्य विधानसभेवर निवडून आलेले आहेत. सदर ४ आमदार महोदयांना विधानपरिषद सदस्य म्हणून त्यांच्या कार्यकालानुसार प्रत्येकी रु.३२०.००लक्ष इतका निधी अनुज्ञेय असून त्यांना त्यापैकी प्रत्येकी

रु.२००.००लक्ष इतका निधी यापुर्वी वितरित करण्यात आलेला आहे. सद्यस्थितीत उर्वरित प्रत्येकी रु.१२०.००लक्ष याप्रमाणे ४ विधानपरिषद सदस्यांना एकूण रु.४८०.००लक्ष (रुपये चार कोटी ऐंशी लक्ष फक्त) एवढा निधी सोबतच्या सहपत्रात दर्शविल्याप्रमाणे वितरीत करण्यात येत असून सदर निधी संबंधित जिल्हाधिकारी यांच्या अधिनस्त ठेवण्यात येत आहे.

३. तसेच उपरोक्त नमुद केलेल्या ४ विधानपरिषद सदस्यांना त्यांच्या विधीनपरिषद सदस्यत्वाच्या कार्यकालानुसार अनुज्ञेय निधी वितरित करण्यात येत असला तरी, आमदार स्थानिक विकास कार्यक्रम" अंतर्गत परिच्छेद क्र.४.४ मधील तरतुदीनुसार सदर विधानपरिषद सदस्य यांनी विधानपरिषद सदस्य म्हणून शिफारस केलेल्या कामांपैकी त्यांच्या विधानपरिषद पदाच्या कार्यकालाच्या अखेरच्या दिनांकापर्यंत जिल्हाधिकारी यांनी प्रशासकीय मंजूरी दिलेल्या कामांचाच, निधी उपलब्ध करुन देता येऊ शकतो. तरी, संबंधित जिल्हाधिकारी यांनी उपरोक्त नमुद वि.प.स. यांनी विधानपरिषद सदस्य म्हणून शिफारस केलेल्या कामांपैकी दि.२३ नोव्हेंबर २०२४ पर्यंत प्रशासकीय मंजूरी दिलेल्या कामांची खातरजमा करून त्यानुसार निधी उपलब्ध करून द्यावा.

४. जिल्हाधिकारी तथा सदस्य सचिव, जिल्हा नियोजन समिती यांनी नियोजन विभाग, शासन निर्णय क्र. स्थाविका-०६१६/ प्र.क्र.९६/ का.१४८२, दिनांक १२ जुलै, २०१६ च्या तरतुदींच्या अधीन राहून या निधीचे पुढील वितरण तात्काळ करावे. तसेच या निधीमधून आमदार स्थानिकविकास कार्यक्रमांतर्गत वेळोवळी अनुज्ञेय करण्यात आलेल्या बाबींवरील खर्च पुढील लेखाशीर्षांतर्गत सन २०२४-२५ या आर्थिक वर्षामध्ये उपलब्ध तरतूदीमधून भागविण्यात यावा.

मागणी क्र. ओ - १०
४५१५- इतर ग्राम विकास कार्यक्रमावरील भांडवली खर्च,
(००) १०२ सामुहिक विकास
(०१) (००) (०१) आमदार स्थानिक विकास कार्यक्रम (४५१५००१२)
( योजनांतर्गत ) ( दत्तमत )
५३ - मोठी बांधकामे

५. वित्त विभागाच्या संदर्भाधीन क्र. २ येथील शासन परिपत्रक क्र. अर्थसं - २०२४ / प्र.क्र. ८०/ अर्थ - ३, दि. २५ जुलै, २०२४ अन्वये प्रशासकीय विभागांना प्रदान केलेल्या अधिकारितेत हा शासन निर्णय निर्गमित करण्यात येत आहे.

६. महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर हा शासन निर्णय उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०२५०३०४१५२०४१४९१६ असा आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावांने,

NITIN BHANUDAS KHEDKAR

Digitally signed by NITIN BHANUDAS KHEDKAR
DN: CN = NITIN BHANUDAS KHEDKAR, C = IN, S = Maharashtra, O = GOVERNMENT OF MAHARASHTRA, OU = PLANNING DEPARTMENT
Date: 2025.03.04 15:22:41 +05'30'

**( नि.भा.खेडकर)**
**उप सचिव , महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१) मा. उपमुख्यमंत्री (नियोजन) यांचे खाजगी सचिव.
२) महालेखापाल (लेखापरीक्षा)/ (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र , मुंबई/नागपूर.
३) जिल्हाधिकारी (नंदूरबार/सांगली/नागपूर).
४) उपायुक्त (नियोजन),विभागीय आयुक्तांचे कार्यालय,( नाशिक/पुणे/नागपूर ).
५) जिल्हा नियोजन अधिकारी (नंदूरबार/सांगली/नागपूर ).
६) जिल्हा कोषागार अधिकारी (नंदूरबार/सांगली/नागपूर ).
७) वित्त विभाग ( कार्यासन अर्थ-१६/व्यय-८ ).
८) नियोजन विभाग, अर्थसंकल्प कक्ष (का.१४२४),
९) निवडनस्ती, नियोजन विभाग.

| विधानपरिषद सदस्यांमधील विधानसभेवर निवडून आलेल्या सदस्याना विधानपरिषद सदस्य म्हणून त्यांच्या कार्यकालानुसार अनुज्ञेय निधी | | | | | | |
|---|---|---|---|---|---|---|
| शासन निर्णय क्रमांक स्थाविका-०६२४/प्र.क्र.१००/का.१४८२, दि. ४ मार्च, २०२५ चे सहपत्र | | | | | | |
| | | | | | | (रुपये लक्ष) |
| | वि.प.स. यांचे नाव | नियुक्तीचा दिनांक | कार्यकाल समाप्तीचा दिनांक | विधानपरिषद सदस्य म्हणून अनुज्ञेय निधी | यापुर्वी वितरीत निधी | वितरित निधी |
| १ | २ | ३ | ४ | ५ | ६ | ७ |
| | नंदूरबार | | | | | |
| १ | श्री. आमश्या पाडवी | ०७.०७.२०२२ | २३.११.२०२४ | ३२०.०० | २००.०० | १२०.०० |
| | सांगली | | | | | |
| २ | श्री. गोपिचंद कुंडलिक पडळकर | १३.०५.२०२० | २३.११.२०२४ | ३२०.०० | २००.०० | १२०.०० |
| | नागपूर | | | | | |
| ३ | श्री. प्रविण प्रभाकरराव दटके | १३.०५.२०२० | २३.११.२०२४ | ३२०.०० | २००.०० | १२०.०० |
| ४ | श्री. चंद्रशेखर कृष्णरावजी बावनकुळे | ०१.०१.२०२२ | २३.११.२०२४ | ३२०.०० | २००.०० | १२०.०० |
| | एकूण वि.प.स. ०४ | | | १२८०.०० | ८००.०० | ४८०.०० |

NITIN BHANUDAS KHEDKAR

Digitally signed by NITIN BHANUDAS KHEDKAR
DN: CN = NITIN BHANUDAS KHEDKAR, C = IN, S = Maharashtra, O = GOVERNMENT OF MAHARASHTRA, OU = PLANNING DEPARTMENT
Date: 2025.03.04 15:22:51 +05'30'

(नि.भा.खेडकर)

उप सचिव, महाराष्ट्र शासन